मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत नाशिक जिल्ह्यातील रस्त्यांची प्रशासकीय मान्यता रद्द करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मुग्रायो-२०२३/प्र.क्र.१४२/बांधकाम-४**
बांधकाम भवन, ५वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : ०७ मार्च, २०२४.

**वाचा:**

१) **शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्रमांक** : मुग्रायो-२०२३/प्र.क्र. १४२/ बांध ४, दिनांक ०३ मार्च, २०२३.

२) **शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक** : डीएपी-१०२२/प्र.क्र. १७/का.१४८१, दिनांक १८ मे, २०२२.

३) **शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्रमांक** : मुग्रायो-२०२३/प्र.क्र. १४०/ बांध ४, दिनांक ०८ मार्च, २०२३.

४) **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांक :** मुअ/प्रमंग्रासयो/४७८६/२०२३, दिनांक २४ नोव्हेंबर, २०२३.

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत नाशिक जिल्ह्यातील उपरोक्त वाचामधील अ.क्र. ०१ येथील शासन निर्णयान्वये ३० रस्ते कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत उपरोक्त वाचा मधील अ.क्र. ०२ येथील शासन निर्णयान्वये नाशिक जिल्ह्यासाठी सन २०२२-२३ व २०२३-२४ या वित्तिय वर्षात प्रत्येकी ५३४०.०० लक्ष असा एकूण १६६८०.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार उपरोक्त वाचा मधील अ.क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये नाशिक जिल्ह्यातील ९०४७.२९ लक्ष किंमतीच्या २५ कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्याने नाशिक जिल्ह्यासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत १६३२.७१ लक्ष इतका निधी शिल्लक असल्याचे निदर्शनास येत आहे. सबब, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांनी उपरोक्त वाचामधील अ.क्र. ०४ येथील पत्रान्वये नाशिक जिल्ह्यातील १६९५.७२ लक्ष किंमतीच्या ०२ कामांना आशियाई विकास बँक (ADB) अंतर्गत प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता रद्द करून सदर ०२ कामांना जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत नव्याने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांनी सादर केलेला मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत नाशिक जिल्ह्यातील ०२ कामांची प्रशासकीय मान्यता रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्य अंतर्गत नाशिक जिल्ह्यातील उपरोक्त वाचा मधील अ.क्र. ०१ येथील शासन निर्णयान्वये खालील ०२ कामांना प्रदान केलेली प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे

उपरोक्त वाचामधील अ.क्र. ०१ मधील रद्द करण्यात येत असलेल्या कामांचा तपशील खालीलप्रमाणे.

| अ. क्र. | तालुका | पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | लांबी (कि.मी) | अंदाजित किंमत (रु. लक्ष) | कामाची नियमीत ५ वर्ष देखभाल दुरुस्ती किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | येवला | ADB-NAS(II)-०१ | देवळाणे, देवठाण ते पिंपळखुटे (बु.), चव्हाण वस्ती रस्ता (TR- ०८, VR-६५,२०९) (भाग-देवळाणे ते देवठाण, इजिमा -१८८ रस्ता) | १०.०६० | ७०७.६६ | ३२.१६ |
| ८ | नांदगांव | ADB-NAS(II)-०६ | हिसवळ बु. शास्त्रीनगर, धरेर, नवसारी, खादगांव, कुंदलगांव रस्ता (TR - १२, ODR-२०२, VR-५२,६३,६) (भाग - हिसवळ बु. शास्त्रीनगर व प्रजिमा -८२ ते कुंदलगांव रस्ता) | १३.३८० | ९१५.२७ | ४०.६३ |
| **एकूण ०२ कामे** | | | | **२३.४४०** | **१६२२.९३** | **७२.७९** |

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७११५५०९९८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.07 14:11:14 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विधानसभा /विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, नाशिक.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
६) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय मुंबई-३२.
७) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

८) अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था नाशिक विभाग, नाशिक.
९) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा नाशिक
१०) कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, नाशिक.
११) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१३) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य
१४) निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.